**<u>ॲड. राजीव चव्हाण, विशेष सरकारी अभियोक्ता यांना व्यावसायिक फी मंजूर करण्याबाबत.</u>**
**वर्सोवा पोलीस ठाणे, मुंबई गु.र.क्र. २४६/२००९ या गुन्ह्यातून उद्भवलेल्या मा. उच्च न्यायालय, मुंबई येथील न्यायालयीन कामकाजासाठी.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : न्यायप्र-०१२०/प्र.क्र.०१/पोल-१०**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक: १० मे, २०२४.

**संदर्भ :-** (१) शासन पत्र, विधि व न्याय विभाग क्र. २७/क्रि.जन/२०२०/'अ' -शाखा, दि. १६.०३.२०२०
(२) शासन निर्णय, वित्त विभाग क्र. विअप्र-२०१५/प्र.क्र.२१/२०१५/विनियम,दि. २९.०७.२०१५.
(३) शासन निर्णय, वित्त विभाग क्र. विअप्र-२०१५/प्र.क्र.२१/२०१५/विनियम,दि. १६.०६.२०१७.

**शासन निर्णय**:-

वर्सोवा पोलीस ठाणे, मुंबई गु.र.क्र.२४६/२००९ या गुन्हयातून उद्भवलेल्या मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे दाखल क्रिमिनिल अपिल क्र.८५४/१३,३५०/१५, ९४२/१३,९४३/१३, ९४४/१३, १०३८/१३, १२४२/१८, १४८८/१८,१४९०/१८, आणि १४९३/१८ (रामप्रसाद विश्वनाथ गुप्ता विरुध्द महाराष्ट्र शासन व इतर) या न्यायालयीन प्रकरणात मा.उच्च न्यायालय, मुंबई येथे विशेष सरकारी अभियोक्ता म्हणून शासनाच्या वतीने बाजू मांडण्यासाठी ॲड. श्री. राजीव चव्हाण यांची संदर्भाधीन क्र.१ येथील विधि व न्याय विभाग अ शाखा यांच्या दि.१६.०३.२०२० च्या पत्रान्वये विशेष सरकारी अभियोक्ता म्हणून नियुक्ती करण्यात आली आहे. त्यानुषंगाने ॲड.राजीव चव्हाण यांना खालीलप्रमाणे व्यावसायिक फी अदा करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

अ) प्रतिदिन परिणामकारक सुनावणी फी :- रू. ३,००,०००/- (अक्षरी रुपये तीन लाख फक्त)
ब) प्रतिदिन अपरिणामकारक सुनावणी फी - रू. ५०,०००/- (अक्षरी रुपये पन्नास हजार फक्त)
क) विचारविनिमय फी :- रु.५०,०००/- (अक्षरी रुपये पन्नास हजार फक्त) आणि
ड) प्रति मसुदा फी :- रु.५०,०००/- (अक्षरी रुपये पन्नास हजार फक्त)

सदर फी व्यतिरिक्त अन्य कोणतेही लाभ ॲड. राजीव चव्हाण यांना अनुज्ञेय होणार नाहीत.

२. परिणामकारक सुनावणीचे दिवस संबंधित प्रकरणाच्या पर्यवेक्षीय पोलीस उपायुक्त दर्जाहून कमी नाही, अशा अधिकाऱ्याकडून तसेच संबंधित मा. न्यायालयाच्या प्रबंधकाकडून तपासून, प्रमाणित करून घेण्यात यावेत व कोणत्याही प्रकारचे अतिरिक्त प्रदान होणार नाही, याची दक्षता संबंधित पोलीस उपायुक्त यांनी घ्यावी.

३. यासाठी येणारा खर्च या विभागाच्या "मागणी क्र. बी-१, २०५५ पोलीस - (००) १०८, राज्य मुख्यालय पोलीस (०२) (०१) शहर पोलीस आस्थापना - (२०५५ ००९७) - २८-व्यावसायिक सेवा" या लेखाशीर्षाखालील त्या त्या आर्थिक वर्षाच्या अर्थसंकल्पीय तरतुदीच्या उपलब्धतेच्या अधीन आणि मंजूर अनुदानातून व मासिक निधी विवरणपत्रानुसार भागविण्यात यावा.

**४.** प्रस्तुत शासन निर्णय संदर्भ क्र. २ व ३ वरील वित्त विभाग शासन निर्णयानुसार मा. उच्च न्यायालय व मा. सर्वोच्च न्यायालयातील न्यायालयीन प्रकरणी नेमण्यात आलेल्या विशेष सरकारी अभियोक्त्यांना फी अदा करण्यासंदर्भात प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहेत.

**५.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०५१५११२४२३१४२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

HARESHWAR NAMDEO SAHANE

Digitally signed by HARESHWAR NAMDEO SAHANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, 2.5.4.20=c666d6034b5e98c5d1bd37af6d50b3277469ad6a9c55fe42051469194c47c2d0, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=A0C4666E299E972427F9DABEDD7FF52FB5313B50C0D9A59C64EC908916651EC1, cn=HARESHWAR NAMDEO SAHANE
Date: 2024.05.15 11:36:53 +05'30'

**( हरेश्वर सहाणे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य,मुंबई.
२.पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई.
३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा) महाराष्ट्र१, मुंबई.
४. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
५. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
६.सरकारी अभियोक्ता, उच्च न्यायालय, मुंबई.
७ ॲड. राजीव चव्हाण, १४६, मित्तल कोर्ट, सि विंग, विधानभवन समोर,नरीमन पॉईंट, मुंबई-२१.
८. विधि व न्याय विभाग (अ शाखा व कार्यासन-१८) मंत्रालय, मुंबई.
९. निवड नस्ती (पोल-१०).